# विट्टे : जमिनीच्या विकासाचा सामूहिक प्रवास

इजामसाय काटेंगे

आताच्या वाढत्या लोकसंख्येमुळे नैसर्गिक संसाधन संपत जाते. दिवसेंदिवस सगळीकडे जमीन ओसाड दिसत आहे. दरवर्षी पावसाचे प्रमाण बदलत असते. त्यामुळे दिवसेंदिवस हाळोखाचे प्रमाण वाढत असते. लोक आपला व कुटुंबाचा उदरनिर्वाह करण्यासाठी रोजीरोटीकरीता भटकत असतात. १३ टक्के लोकांनी आपली शेतीवाडी सोडून शहराकडे स्थलांतर केले आहे. तसेच आता सुशिक्षित, बेरोजगार असलेले युवक-युवती शेतात काम करण्यास लाजतात. कोरची, कुरखेडा या आदिवासी क्षेत्रात उदरनिर्वाहाचे साधन मुख्यतः जंगल. जंगल संपुष्टात आल्यामुळे शेतीचे उत्पादनावर परिणाम झाला आहे. वरून पडणारा पाऊस आपल्याबरोबर जमिनीचा कस वाहून नेतो. जमिनीचा कस वाहून गेल्यानंतर अशा जमिनीमध्ये पाहिजे त्या प्रमाणात पीक येत नसते. मग जमीन पडीत राहते. लोकांचे लक्ष नेहमी दोन वेळचे जेवणाची व्यवस्था कशी होईल याच्याकडे असते. भरी जमिनीत कंटुरींग केले नसतात. जमीन-दुरुस्तीसाठी लोकांना वेळ नसतो. अशा वेळेस लोकांच्या हाती काहीच उपाय राहत नाही. अशा वेळेस गरीब लोक कुणा तरी श्रीमंत माणसाचे गुलामीत नेहमी जुंपलेला असतो. श्रीमंत लोकांच्या शेतात किंवा घरात आपले पूर्ण आयुष्य संपवीत असतो.

लहान लहान खेड्यात लोकवस्ती करून असणाऱ्या आदिवासींमध्ये अगोदरपासून 'विट्टे' पद्धती आहे. सुरुवातीला या विट्टे कामात श्रीमंत लोकांनाच जास्त फायदा होत होता. कारण की, त्यांच्याकडे जेवण घालण्यासाठी भरपूर पैसा, अन्न असते. त्यावेळेस विट्टे कामात जेवणामध्ये दारू देत होते. म्हणून गरीब लोकांना विट्टेची संधी मिळत नव्हती. 'आम्ही आमच्या आरोग्यासाठी' या स्वयंसेवी संस्थेने लोकहिताचे काम करीत असताना या विट्टे कामातून गावातील सगळ्या लोकांना फायदा होईल आणि सर्वांना परवडेल अशी संकल्पना लोकांपुढे मांडली. सगळ्यात

पहिला प्रयोग साल्हे गावात करण्यात आला. लोकांनी शेती-दुरुस्तीचे विट्टं काम सुरू केले. रात्री एकटे बसून विचार करणे, दिवसा शेतात जाऊन एकमेकांना शेती-दुरुस्ती कामात मदत करणे. काम करीत असताना मेहनतीची किंमत घेत नव्हते, आणि फुकट काम करीत नव्हते. म्हणजेच विट्टं काम होय. या शेती-दुरुस्ती कामात किंमत ठरविली जात नव्हती, परंतु सगळ्यांचे काम होत होते. एक वेळचे साधे जेवण द्यावे लागते. या पद्धतीमुळे सगळ्या लोकांना फायदा झाला. सर्वांचे शेतात माती टाकली गेली. पूर्वी विट्टं काम करीत असताना गरीब लोकांचे रोजच्या उदरनिर्वाहात अडचण निर्माण होत होती. लोकांची अडचण दूर करण्यासाठी साल्हेच्या ग्रामसभेला १५,००० रु. संस्थेने दिले. या पैशाचा उपयोग लोकांनी विट्टं काम करताना जेवण देण्यासाठी किंवा शेतीचे काम करण्यासाठी केला. शेतीमंडळातून २/- रुपये व्याज दरावर कर्ज घेत असतात. सगळे एकत्र बसून विचार करून कर्ज देत असतात.

साल्हे गावाने विट्टं पद्धतीने शेती-दुरुस्तीचे प्रयोग केले. या कामाची माहिती कोरची परिसरात, तसेच कुरखेडा भागात ग्रामसभांमध्ये संस्थेच्या कार्यकर्त्यांनी दिल्यानंतर आणि साल्हेत प्रत्यक्ष विट्टं काम झाल्याचा अनुभव पाहिल्यानंतर कोरची भागात भुऱ्यालदंड, आस्वलहुंडकी, सुरवाही, कोरची, काळे, भर्रीटोला, झेंडेपार, नांदळी इत्यादी गावांमध्ये विट्टं काम गाव-संघटनेचे काम झाले. विट्टंचे शेत-दुरुस्ती कामात सहभागी झालेल्या सगळ्या लोकांचे शेतीत दुरुस्ती होत गेली आणि कमी खर्चात जास्त काम झाले. ज्या ठिकाणी लोकांचे संघटन आहे, संघटनेच्या माध्यमाने सर्वांचे हिताचे काम होते, अशा ठिकाणी शेतबोडीचे कामही 'आम्ही आमच्या आरोग्यासाठी' संस्थेकडून झाले आहे. उदा. कुरखेडा भागात चांदोना गावात शेतबोडीचे काम झाले. शेतजमीन-विकास कामाबरोबरच सेंद्रिय खताचे खड्डे व प्रशिक्षणाची व्यवस्था संस्थेतर्फे करण्यात आली. आर्थिक खर्चात बचत करण्यासाठी बेशरम, कडूलिंब पाल्यापासून फवारणी गावाचे लोकांना शिकविण्यात आली. लोकांनी या प्रशिक्षणात अनुभव घेतले. याचा फायदा नेहमीकरता होत आहे. रासायनिक औषधावर होणारा खर्च कमी झाला आहे.